# न झुकणारी इमोजिनी

कैंडिस, चित्र: नैंसी, मराठी: प्रमोद






लिडेलविले, न्यू हॅम्पशायर, इतकं छोट शहर होतं, की राज्याच्या नकाशावर त्याच्यासाठी एक लहान बिंदू देखील नव्हता. तरीही लिडेलविले एक समृद्ध गाव होतं. तिथे एक दुकान, तीन पायांची एक मांजर, आणि इमोजिनी ट्रिप नावाची एक लहान मुलगी होती.




इमोजिनीस इतिहासा विषयी खूपच प्रेम होतं. जेव्हा ती खूपच लहान होती तेव्हा तिच्या तोंडातून निघालेले पहिले शब्द होते, ***“आजपासून सत्याऐंशी वर्षांपूर्वी.”***




जेव्हा तो केजी मध्ये होती तेव्हा तिने पेंट मध्ये बोट बुडवून "ऑरेगोन ट्रेल" (ऐतिहासिक पागडंडी) चित्र चित्रित केली.

किंडरगेरटेनच्या शो-टाइम मध्ये इमोजिनी बाकी मुलांना, महत्त्वाच्या ऐतिहासिक स्त्रियांच्या कथा सांगत असे.



आता इमोझिनीचे लक्ष **लिड्डेलविल्ले हिस्ट्री सोसाइटी** वर होते. सोसायटी शेकडो वर्षे जुनी होती. तिची इमारत धूळधरी होती आणि पुरातन वस्तूंचे एक संग्रहालय होती. इमारत मुख्य रस्त्याच्या शेवटी स्थित होती. तिथे कोणीच येतजात नव्हते. कुणालाही तिची काळजी नव्हती. एक दिवस इमोजिनीने तिचा चरचर करणारा दरवाजा धक्का देऊन उघडला.

# “व्वा!” इमोजिनी ओरडली



"इथे इतका कचरा आहे" तिचे वडील म्हणाले.

इमोजिनीने नकारार्थी मान हलवली. "हा कचरा नाही, बाबा," इमोजिनी म्हणाली. "हा इतिहास आहे आणि डॉ. मार्टिन लूथर किंगच्या अमर शब्दांत, ***" आपल्याला इतिहास घडवतो."***




मग इमोजिनीने तेथे एक स्वच्छता अभियान सुरु केले. तिने कोळ्यांचे जाळे काढून टाकले, जुन्या पत्रांना फाईल केले, पिवळ्या छायाचित्रांना अल्बम मध्ये लावले, जीवाश्म ओळखल्या आणि सर्व गोष्टी सुबकपणे सुशोभित केल्या. तेथे एक मोठे, जुने ऐतिहासिक पलंग पण होते.



स्वच्छतेचे काम पूर्ण केल्यानंतर इमोजीनीने प्रतीक्षा केली....



... ती फक्त प्रतीक्षा करत राहिली



आपल्या शहरवासियांना तिला तिथला अमूल्य ऐतिहासिक वारसा दाखवायचा होता. पण .....

"डेव्हिड क्रोकेटच्या अमर शब्दांमध्ये," एक मोठा श्वास टाकत ती म्हणाली, ***"काय, कोणीही येणार नाही."***




मग सोमवारी एक मनुष्य आला. त्यांने सोसाइटीचा दरवाजा ठोठावला.




""काय ही इमारत पडणार?" इमोजिनी ओरडली. परंतु विल्यम मॉरिसच्या अमर शब्दांत, ***"आम्ही या इमारतींचे मालक नाही, या इमारती आमच्या पूर्वजांच्या होत्या आणि पुढे त्या आमच्या मुलांच्या असतील."***

तो माणूस खांदे उडवत म्हणाला "मला हे सांगू नका, महापौरकडे (मेयर) जा आणि त्यांना सांगा."

इमोजिनीनेही तसेच केले.




इमोजिनीचे म्हणणे ऐकल्यानंतर मेयर बट्टझने सांगितले. "मी माझ्या निर्णयावर ठाम आहे. जुने नष्ट करा, आणि नव्याची निर्मिती करा. "

"पण मग आमच्या ऐतिहासिक सोसायटीचं काय होईल?" इमोजिनीने विचारले.

"कोण इतिहासाची काळजी करतो?" महापौर म्हणाले. "बुटांच्या नाड्यांचा (शू-लेस) कारखाना सुरु होईल तर आपले शहर देशाच्या नकाशावर चमकेल." मग महापौरांनी इमोजीनीला दरवाजाचा मार्ग दाखवला.




महापौरांच्या घरातून बाहेर पडल्यावर, इमोजिनीने आपला राग व्यक्त केला. "मी हे घडू देणार नाही! जॉन पॉल यांच्या अमर शब्दांत, ***"अजून तर मी माझी लढाई सुरूच केली नाही!"***

त्या नंतर इमोजिनी ठामपणे लढली!



मंगळवारी, तिने हॅलोविन फेस्टिव्हलमध्ये खरेदी केलेला पॉल रिव्हर वाला ड्रेस घातला. त्यानंतर, इमोजिनी काठीच्या घोड्यावर बसून मुख्य रस्त्यावर आली. "पहा बुलडोजर येत आहेत! बुलडोझर येत आहेत! "ती ओरडली.

इमोजीनीच्या आरड्याओरड्याकडे कोणीही लक्ष दिले नाही.



शेवटी श्री. टुटटिलेव्हट त्याच्या दुकानातून बाहेर पडले. "आपल्या घोडाचा लगाम ओढ, मुली. तुला हे ठाऊक नाही का कि बुटांच्या नाड्यांचा कारखाना सुरु होईल तर आपले शहर देशाच्या नकाशावर चमकेल?"

इमोजीनीने घोड्याची काठी ओढली. "थियोडोर रूझवेल्ट, यांच्या अमर शब्दांत, ***बाल्डरडाश!"***

मग ती पाय आपटत घरी आपल्या वडिलांच्या जवळ गेली.




बुधवारी सकाळी, इमोजिनीने आपली मोहीम चालूच ठेवली. तिने स्वतःबरोबर एक शिडी आणि एक लाल-पांढरी-निळी फीत घेतली. मग तिने शहरातील प्रत्येक झाड, प्रत्येक विजेचा खांब, प्रत्येक पार्किंग मीटर, प्रत्येक फलक, प्रत्येक पत्र पेटी, प्रत्येक सायकल स्टॅन्ड, प्रत्येक बाबागाडी, प्रत्येक कुत्र्याचा गळा यांत तिरंगी फिती बांधली.

"आपल्या भूतकाळाचा चाकणाचूर होऊ देऊ नका!" ती ओरडली.




संपूर्ण शहरात इमोजीला कुणाचेही समर्थन मिळाले नाही.

शेवटी, अधिकारी डिट्विल्यम म्हणाले, "मुली, तुझी हि फीत अतिशय सुंदर आहे परंतु बुटांच्या नाड्यांचा कारखाना बनेल तर आपले शहर नकाशावर चमकेल!"

इमोजिनीने नाक मुरडले आणि ती वडिलांच्या जवळ घरी परतली.




गुरुवारी, इमोजीनीने आपली मोहीम चालूच ठेवली. सकाळी उठून तिने खूप पोस्टर बनवले. मग, सूर्योदय होताच, एका लहान विमानाने लिडेलविलेवर शेकडो पत्रकं टाकली.

पत्रकांवर लिहिलेले होते, ***"आपल्या इतिहासाचे जतन करण्यासाठी शहराच्या मैदानावर एक मोठा मोर्चा!"*** लोकांनी प्रत्येक पत्रक वाचलं.

# आपला इतिहास वाचवा




पण कोणीही मैदानावर आलं नाही. फक्त छोटा अब्नेर प्रिट त्याच्या तीन चाकी सायकलवर आला. "इम्मी," तो म्हणाला, "तुला समजत कसं नाहीये की बुटांच्या नाड्यांचा कारखाना बनेल तर आपले शहर नकाशावर चमकेल!“ आतापर्यंत इमोजिनीला या शब्दांचा कंटाळा आला होता



"चीफ जोसेफच्या अमर शब्दांत," इमोजिनी म्हणाली, *"माझे मन आजारी आणि दुःखी आहे."*

मग ती वडिलांजवळ घरी गेली

मग शुक्रवार आला. इमोजिनी तिच्या प्रिय लिडेलव्हिले हिस्ट्री सोसायटीमध्ये फिरत राहिली. "गुडबाय फोटोग्राफ्स," ती रडत रडत म्हणाली. "गुडबाय जीवाश्म आणि मोठे बेड! गुडबाय, जुन्या पत्रांनो!"



तेव्हाच एका जुन्या पत्राने तिचे लक्ष वेधले.

इमोजीनीने एकदा ते वाचले.

मग पुन्हा ते वाचले.

मग तिसर्यांदा वाचले



**ऑक्टोबर 16, 1789**

प्रिय सर

गेल्या मंगळवारी आपण केलेल्या आदरातिथ्याबद्दल मी आपले हार्दिक आभार मानतो. आपण तयार केलेला सूप फार चांगला होता, आणि मोठा बेड अतिशय मऊ आणि आरामदायक होता. माउंट वरनोन सोडल्यापासून मी कधीच एवढ्या आरामात झोपलो नव्हतो.

आपला  नम्र आणि आज्ञाधारक सेवक

जॉर्ज वॉशिंग्टन

इमोजीनीने दीर्घ श्वास घेतला - जॉर्ज वॉशिंग्टन? ते त्या बेडवर खरोखर झोपले होते का?

इमोजीनीने त्वरीत ही बातमी सर्व महत्वाच्या लोकांपर्यंत पोहचविली.



या महान लोकांमध्ये, लिडेलविलेमधधील प्रचलित इतिहास प्राध्यापिका कॉर्नेलिआ टोस्टमास्टर्स देखील होत्या. "थोडी घाई करा," इमोजिनीने त्यांना विनंती केली. मग त्याने ईमेलचे "सेन्ड" बटण दाबले. त्यानंतर ती पुन्हा पुढे मागे फिरू लागली. वेळ! तिच्याकडे थोडा अधिक वेळ असायला हवा होता! पण ती बिचारी काय करू शकली असती, ती खूपच असहाय्य होती.

तेव्हाच एक प्रेरणेची लहर तिच्यात सळसळली.





मग काय! इमोजीनी तिच्या कामाला लागली



जेव्हा बुलडोझर्स शनिवारी आले तेव्हा इमोजीनी ट्रिप त्यांच्यासाठी पूर्णपणे तयार होती.

"व्हियेतनाम युद्ध विरोधकांच्या अमर शब्दांनुसार, ***"इमोजिनी ओरडली, "तुम्ही खड्ड्यात जा, मी इथून कधीच हटणार नाही!"***

बुलडोजर्सच्या इंजिनांचा आवाज आता बंद झाला.

बुलडोजर वाट पाहत राहिले... शांतपणे बघत राहिले ...



तितक्यात इमोजिनीचे वडील पळत पळत आले. "इमोजीनी, त्यांच्या मार्गातून बाजूला हो!" पण इमोजीनी आपले खांदे सरळ करत म्हणाली, "बाबा, तुम्हाला अब्राहम लिंकनचे अमर शब्द आठवत नाहीत, ***"बाँझ (ओक) हे मोठे वृक्ष खरतर एक लहानसे बीज आहे जे मातीशी चिकटून राहते."***

“मी पण माझ्या जमिनीशी बिलगून राहीन.”




तेव्हाच मेयर बुत्ज़ रागाने फुसफुसत शिडी चढून वर आले. "पटकन स्वतःला बाहेर काढ.", त्यांनी आदेश दिला.

"मी असा बिलकुल करणार नाही" इमोजिनी रडत म्हणाली.

मग मेयर इमोजीनी च्या वडिलांकडे गेले आणि त्याना त्यांनी विनंती केली, "आता तुम्हीच काहीतरी करा."



इमोजिनीच्या वडिलांनी प्रथम मेयरकडे बघून पुन्हा इमोजीनी कडे पहिले. "नाही आम्ही इथून बिल्कुल हटणार नाही", त्यांनी शेवटी रडत सांगितले.




मेयर बुत्ज़ चे नाक फुगू लागले. "ती लहान मुलगी त्या पलंगामध्ये आता नाही राहू शकत नाही. जर ती हटली नाही तर तिला चिरडा!" मग ते आदेश देण्यासाठी बुलडोझर वाल्यांकडे पळाले.



सूर्य थोडा वर येताच शहरवासीय  हळू हळू परिस्थिती पाहण्यासाठी तिथे जमू लागले. सर्वप्रथम मिस्टर तुत्त्लविट आले. त्यानंतर ऑफिसर दित्ज़विलियम आले. त्यांच्यानंतर आपल्या तीन चाकी सायकल वरून छोटा अब्नेर पिट पोहोचला. तो ओरडला, "इम्मी, तू ठीक तर आहेस ना?"



“प्रेसिडेंट मार्टिन वैन बुरेन च्या अमर शब्दात "**मी ठीक आहे**", इमोजिनी ने दमदार आवाजात उत्तर दिले.



“दुपारपर्यंत सर्व टीव्ही रिपोर्टर्स देखील, तेथे पोहचले. ते त्या लहान मुलीची मुलाखत घेऊ इच्छित होते जिने हिस्ट्री सोसाइटी च्या सोप्यामधून हटायला नकार दिला होता.

एलेअनोर रूज़वेल्ट यांच्या अमर शब्दांत, **"तुम्ही ते काम करा जे तुम्हाला वाटते कि तुम्ही कधीच करू शकणार नाही"**, इमोजीनी त्यानां म्हणाली.



तेव्हा एक काळ्या रंगाची गाडी तेथे पोहचली. कारचा दरवाजा उघडला आणि त्यातून प्रोफेसर पास्पाटेटर्स बाहेर पडल्या! त्यांना बघून इमोजिनी ने एक दीर्घ श्वास घेतला.

त्याच्या नंतर .....




"अमेरिकेच्या राष्ट्राध्यक्षा!" जमाव त्यांना पाहून ओरडला.

अध्यक्ष सरळ कॅमेराकडे गेल्या. "मी या प्राचीन इमारतीला एक राष्ट्रीय स्मारक घोषित करण्यासाठी आले आहे.

"जॉर्ज वॉशिंग्टन, येथे झोपले होते!"

इमोजिनी आनंदाने किंचाळली.



“आपला विजय झाला!”

"यात काय शंका आहे!" प्रोफेसर पाश्मॅटर्स यांनी डोकं हलवत म्हटले.

"मला तुझा खूप अभिमान आहे," इमोजिनीचे वडिल म्हणाले.





नंतर अब्नेर पिट पुढे आला. "थांब!" तो ओरडला. "मग बुटांच्या नाड्यांचे काय होईल?"

"नाड्या?" मेयर बुत्झ म्हणाले. "आता नाड्यांची पर्वा कुणाला आहे?" ते कॅमेऱ्यासाठी हसले. "आता आमचे शहर निश्चितपणे देशाच्या नकाशावर असेल."



शहरवासियांनी आनंद साजरा केला. बुलडोज़र आवाज करत परत निघून गेले.

मग इमोजिनी ने आपल्या खिशातून चावी काढली आणि स्वतःला मुक्त केले.

त्यानंतर सर्व लोकांनी ज्यांच्यामध्ये मिस्टर बुत्ज़ देखील होते, लिड्डेलविल्ले हिस्ट्री सोसाइटी मधून चक्कर मारली.



"माझ्या अमर शब्दानुसार," अतिथींना बाय बाय करत इमोजिनी म्हणाली. **"यात मला खूप मजा आली!"**

"खरेच," तिचे वडील देखील हंसत हसत म्हणाले "खरंच खूप मजा आली."

# इमोजिनी ट्रिप चे ऐतिहासिक सत्य

*अब्राहम लिंकनच्या गॅटिसबर्गच्या भाषणाचे पहिले शब्द होते **"सत्याऐंशी वर्षांपूर्वी".** गृहयुद्धा दरम्यान आपल्या भाषणात, त्यांनी सर्व अमेरिकन नागरिकांसाठी समानतेचे आवाहन केले होते. हे अमेरिकेच्या इतिहासातील सर्वात प्रसिद्ध भाषण आहे. ते इमोजीनीचे पहिले शब्द होते यात काय आश्चर्य?*

**"द ऑरेगोन ट्रेल"** 1800 साली अमेरिकन पायनियरांनी हा रस्ता त्यांच्या घोडागाड्यांवरून पार केला होता. हा मार्ग निर्जन, दाहक, वाळवंटातून आणि हिमाच्छादित दुर्गम डोंगरावर जातो. हा मार्ग पार केल्यानंतर, पायनियर्स पॅसिफिक महासागराच्या परिसरात स्थायिक झाले.





**डॉ. मार्टिन लुथर किंग** – नागरी अधिकारांचे एक महान नेते होते. लोकांच्या जीवनातील इतिहासाची भूमिका समजावून सांगत असतांना त्यांनी धार्मिक भाषणात सांगितले. "**आम्ही इतिहासाचे निर्माते नाही आहोत**," ते म्हणाले. "**इतिहास आम्हाला घडवतो**."



**डेवी क्रोकिट** – 1835 मध्ये, फ्रंटियरचे लोक टेक्सासच्या स्वातंत्र्य चळवळीत सहभागी झाले. टेक्सास तेव्हा मेक्सिको मध्ये होते, अमेरिकेत नव्हते. डेव्ही क्रॉकेट आणि 200 जण एक मिशन कम्पाउंड - अलामो मध्ये घुसले. तेथे, त्यांनी एक मंच बनवण्याचा प्रयत्न केला दुर्दैवाने, तेथे मेक्सिकनची संख्या जास्त होती. त्यांना अतिरिक्त सैन्य दल आवश्यक होते. जेव्हा डेवीला कळले की तेथे अतिरिक्त सैन्य येणार नाही, तेव्हा तो म्हणाला, "**काय कोणीही येणार नाही**." तेरा दिवसांनंतर, डेव्ही क्रॉकेट आणि त्यांचे सर्व सहकारी ठार झाले.

**विलियम मोरिस** – शंभर वर्षांपूर्वी, या इंग्रजी लेखक आणि कलाकाराने तेथे ऐतिहासिक इमारती जतन करण्यासाठी लोकांना आवाहन केले - **"आम्ही या इमारतींचे मालक नाही, या इमारती आमच्या पूर्वजांच्या आहेत आणि त्यानंतर आमच्या मुलांच्या होतील."**



**जॉन पॉल जोंस** – क्रांतीकारक युद्धात, या शूर नौ सैनिकाची एका ब्रिटिश जहाजासोबत जोरदार लढाई झाली. जॉन पॉल जोन्सचे स्वत: चे जहाज बुडत असताना, तो ओरडला, "**अजून तर मी माझी लढाई सुरूदेखील केली नाही!**" शेवटी, त्याने युद्ध जिंकले आणि एक महान नायक बनला.



**पॉल रिवीर** – इतिहासात मध्यरात्रीच्या घोडेस्वारीसाठी प्रसिद्ध. त्यांच्यापासूनच अमेरिकन क्रांतीची सुरुवात झाली. एप्रिल 18, 1775 रोजी ते बोस्टन ते लेक्सिंग्टन, मॅसॅच्युसेट्स त्यांच्या घोड्यावरून गेले. त्यांनी अमेरिकन सैनिकांना बजावले की ब्रिटीश सैन्य येणार आहे. एका आख्यायिके प्रमाणे ते धावत्या घोडावरून म्हणाले, "**ब्रिटीश सैन्य येत आहे! ब्रिटिश सैन्य येत आहे**!"



**थिओडोर "टेडी" रूज़वेल्ट** – जेव्हा अमेरिकेच्या 26 व्या राष्ट्रपतीना काहीतरी आवडले, तेव्हा ते त्याला नेहमी "बुली" म्हणायचे. जेव्हा त्यांना राग यायचा किंवा ते खूप अस्वस्थ व्हायचे तेव्हा ते म्हणायचे ***"बाल्डरडाश!"***



**चीफ जोसफ** – पॅसिफिकमध्ये नेस पर्स इंडियन्सचे नेते होते. 1877 साली त्यांनी आपल्या लोकांना वाचवण्यासाठी कॅनडाच्या सीमेपर्यंत नेले. दुर्दैवाने, अमेरिकन सैन्याने त्यांना पकडले. चीफ जोसेफ यांनी शरणागतीपूर्वी म्हटले होते, **"माझ्या सहकाऱ्यांनो माझे म्हणणे ऐका - माझे हृदय आजारी आणि दुःखी आहे. सूर्य माझ्यासमोर उभा आहे - आजपासून मी पुन्हा लढणार नाही."**



**वियतनाम युद्ध विरोधी** – 1965-1975 दरम्यान, अमेरिकेने दक्षिण-पूर्व आशियामधील एका अतिशय लहान राष्ट्राशी -उत्तर व्हिएतनामशी युद्ध लढले. सर्व अमेरिकन नागरिकानी या युध्दाला विरोध केला. मोर्चांमधे व्हिएतनामविरोधी अनेकदा असे म्हणत की "**तुम्ही नरकात जा, आम्ही येथून कधीच निघणार नाही!**" इमोजीनीने या विधानात थोडा बदल केला कारण तिला गैरशब्दांचा वापर करणे शक्य नव्हते.

**प्रेम करा,**
**युद्ध नाही**




**वियतनाम युद्ध**
**बंद करा!**



**अब्राहम लिंकन** – संयुक्त राष्ट्राच्या 16 व्या अध्यक्षांना विचारले होते की, कित्येक गोष्टींमधे अयशस्वी झाल्यानंतर देखील, अखेरीस तुम्ही अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष कसे बनला, तर ते म्हणाले, "पाहा, खूप जुनी म्हण आहे - **"बाँझ (ओक) चे मोठे झाड, प्रत्यक्षात छोटेसे बीज असते जे त्याच्या मातीला धरून राहते."**



**मार्टिन वैन बुरेन** – अमेरिकेचे आठवे राष्ट्राध्यक्ष किंडरहुक मध्ये जन्मले होते, म्हणून लोक त्यांना प्रेमाने "ओल्ड किंडरहुक" म्हणत. राजकीय रॅलीमध्ये, व्हॅन ब्युरेनला असे ओरडणे पसंत होते, "**कारण मी" ओल्ड (ओ) किंडरहुक (के) आहे "म्हणून मी ओके (ठीक) आहे!"**



**एलेअनोर रूज़वेल्ट** एक अतिशय व्यस्त महिला होत्या. 1933 ते 1945 पर्यंत त्या "प्रथम महिला" (अमेरिकन अध्यक्षांची पत्नी) होत्या. त्याचबरोबर त्या नागरी हक्क आणि सामाजिक बदलाच्या कार्यकर्त्या देखील होत्या. लेखक असण्याबरोबरच त्या, संयुक्त राष्ट्र संघात अमेरिकन प्रतिनिधी देखील होत्या. आपल्या यू लर्न बाय लिविंग या पुस्तकात त्यांनी लोकांना हा सल्ला दिला: **"तुम्ही ते काम करा जे तुम्हाला वाटते कि तुम्ही कधीच करू शकणार नाही."**



इमोजीनी ट्रिप ला इतिहास स्मरण करेल कारण तिने केवळ आपल्या स्थानिक हिस्ट्री सोसाइटीचे रक्षणच केले नाही तर  हे अमर शब्द देखील म्हटले, **"यात मला खूप मजा आली!"**



**कैंडिस फ्लेमिंग** किशोर साहित्यातील (मुलांच्या पुस्तके) प्रसिद्ध लेखिका आहेत. त्यांनी मुलांसाठी अनेक पुस्तके लिहिली आहेत ज्यांच्यासाठी त्यांना अनेक पुरस्कार मिळाले आहेत.